जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अस्थायी ०२२०/प्र.क्र.३८/कार्यासन-११**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ सप्टेंबर,२०२०

**पहा:** १. शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१,वित्तीय सुधारणा,दि.१०/९/२००१.
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.अस्थायी ०२२०/प्र.क्र.३८/कार्यासन ११, दि.५/३/२०२०
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.३१/८/२०२०
४. जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांचे पत्र जा.क्र.प्रशा/३८८०/२०२०,दि.८/९/२०२०
५. जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांचे पत्र जा.क्र.प्रशा/३८८३/२०२०,दि.८/९/२०२०

**प्रस्तावना :**

जिल्हा न्यायालय, रायगड- अलिबाग यांच्या आस्थापनेवरील १०९ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.१/३/२०२० ते ३१/८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांनी संदर्भ क्र.४ व ५ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांच्या आस्थापनेवरील १०९ अस्थायी पदे दि.१/९/२०२० ते दि.२८/२/२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे. .

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधीक्षक | २ |
| २ | सहायक अधीक्षक | ८ |
| ३ | लघुलेखक (उ.श्रेणी) | २ |
| ४ | लघुलेखक (निम्न श्रेणी) इंग्रजी | २ |
| ५ | लघुलेखक (निम्न श्रेणी) मराठी | १ |
| ६ | वरिष्ठ लिपीक | १५ |
| ७ | कनिष्ठ लिपीक | ४४ |
| ८ | मुख्य बेलिफ | ४ |
| ९ | बेलिफ | ११ |
| १० | शिपाई | १३ |
| ११ | वाहनचालक | १ |
| १२ | पहारेकरी | ३ |
| १३ | पुर्णवेळ सफाईगार | २ |
| १४ | अंशकालीन सफाईगार | १ |
| | **एकूण** | **१०९** |

२. यासाठी होणारा खर्च जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग या कार्यालयासाठी मागणी क्र.जे-१,२०१४, न्यायदान,१०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (दत्तमत) (अनिवार्य)(२०१४ ०१७२) ०१, वेतन या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१/८/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१५१४१७०१२७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Navagire Santosh Sampatti

Digitally signed by Navagire Santosh Sampatti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Navagire Santosh Sampatti
Date: 2020.09.15 14:58:41 +05'30'

**(सं.सं.नवगिरे)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत:-**

१. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड - अलिबाग.
६. वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.क.कक्ष /अर्थसंकल्प ११,मंत्रालय, मुंबई.
७. विधि व न्याय विभाग, कार्या.-२०/कार्या.-२३,मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन ११)